**महाराष्ट्र राज्यात राज्य मानवी हक्क आयोग स्थापन करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय,क्र. एचआरसी-१०९९ / ३७८ / पोल-१४,
## मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : १५ जानेवारी २०००.

**वाचा :** १) मानवी हक्क संरक्षण अधिनियम, १९९३.

२) न्या. रंगनाथ मिश्रा, अध्यक्ष, राष्ट्रीय मानवी हक्क आयोग, यांचे क्र.४०/१/सीएच/एनएचआरसी-९४, दि.४-१०-१९९४ व १८-७-१९९५ ची पत्रे.

३) माजी केंद्रीय गृहमंत्री, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र.५०११/७०/९६-एचआर, दि. ७-८-१९९६ चे पत्र.

४) केंद्रीय गृहमंत्री, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे दिनांक १८ जानेवारी १९९९ चे पत्र.

**प्रस्तावना :**

कोणत्याही सुसंस्कृत समाजातील लोकांच्या मानवी हक्कांचे संरक्षण करणे व ते वृध्दिंगत करणे ही प्रगतीशील लोकशाही सरकारची मुख्य जबाबदारी आहे. सामाजिक व आर्थिक परिस्थितीमुळे समाजाच्या स्थैर्यतेला व शांततेला निर्माण झालेला धोका तसेच अन्य अनेक बाबींमुळे, मानवी हक्कांच्या सुरक्षिततेबाबत निरनिराळया घटनात्मक तसेच विधी विषयक तरतुदी असूनही, अनेक लोकांकडून त्यांच्या मानवी हक्कांपासून वंचित करण्याबाबतच्या व उल्लंघनाच्या तक्रारी प्राप्त होत आहेत.

**शासन निर्णय :**

उपरोक्त सर्व वस्तुस्थिती लक्षात घेता राष्ट्रीय मानवी हक्क आयोग व केंद्र सरकार यांनी शिफारस केल्यानुसार, महाराष्ट्र शासनाने मानवी हक्क संरक्षण अधिनियम १९९३ मधील प्रकरण क्र.रोमन-५, कलम क्र.२१ च्या तरतुदीनुसार, महाराष्ट्र राज्यात राज्य मानवी हक्क आयोग स्थापन करण्याचा निर्णय घेतला आहे :-

२. **राज्य मानवी हक्क आयोगाची रचना :**

राज्य मानवी हक्क आयोगाची रचना खालीलप्रमाणे राहील :-

अ) उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त मुख्य न्यायाधीश हे आयोगाच्या अध्यक्षपदी राहतील.

ब) उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त अथवा कार्यरत न्यायाधीश हे आयोगाचे एक सदस्य म्हणून राहतील.

क) राज्यातील सेवानिवृत्त अथवा कार्यरत जिल्हा न्यायाधीश हेसुध्दा एक सदस्य म्हणून राहतील.

ड) मानवी हक्क आयोगाचे तज्ञ असलेले किंवा प्रत्यक्ष कार्यानुभव असलेल्या दोन व्यक्ती सदस्य म्हणून राहतील.

३. राज्य मानवी हक्क आयोगाचे मुख्यालय मुंबई येथे राहील.

४. **आयोगाची अधिकार कार्यप्रणाली** - राज्य मानवी हक्क आयोग भारतीय संविधानातील परिशिष्ट-७ मधील यादी क्र. रोमन २ व ३ मध्ये नमूद केलेल्या नोंदीसंबंधी मानवी हक्काचे उल्लंघन झाले असल्यास त्याची चौकशी करेल. (परिशिष्ट क्र.१ अनुसार).

परंतु यापूर्वी अशा प्रकारच्या कोणत्याही प्रकरणामध्ये मानवी हक्क आयोगाने किंवा सध्या अस्तित्वात असलेल्या कायद्यानुसार प्रस्थापित झालेल्या आयोगाने चौकशी केली असल्यास राज्य मानवी हक्क आयोगाने त्याच प्रकरणाची चौकशी करु नये.

आयोगाच्या अधिकाराचा तपशील परिशिष्ट-२ मध्ये नमूद केला आहे.

५. **राज्य मानवी हक्क आयोगाचे अध्यक्ष व इतर सदस्यांची नियुक्ती-**

मानवी हक्क संरक्षण अधिनियमाच्या कलम-२२ प्रमाणे राज्य, राज्य मानवी हक्क आयोगाचे अध्यक्ष व इतर सदस्यांची नियुक्ती करतील. तरी आयोगाचे अध्यक्ष व सदस्यांच्या नियुक्तीकरिता शिफारस करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास शासन मान्यता देत आहे :-

| | |
|---|---|
| १) मा. मुख्यमंत्री | : अध्यक्ष |
| २) विधानसभेचे अध्यक्ष | : सदस्य |
| ३) मा. उपमुख्यमंत्री | : सदस्य |
| ४) विधानसभेचे विरोधी पक्ष नेता | : सदस्य |
| ५) विधान परिषदेचे सभापती | : सदस्य |
| ६) विधान परिषदेचे विरोधी पक्षनेता | : सदस्य |

तथापि, उच्च न्यायालयाच्या मुख्य न्यायाधीशांच्या विचारविनियमाशिवाय उच्च न्यायालयाच्या अथवा जिल्हा न्यायालयाच्या कोणत्याही विद्यमान न्यायाधीशाची नेमणूक केली जाणार नाही.

तसेच वरील समितीचे कोणतेही सदस्याचे पद रिक्त असल्यामुळे राज्य मानवी हक्क आयोगाचे अध्यक्ष किंवा सदस्य यांची कोणतीही नियुक्ती अवैध ठरणार नाही.

६. **राज्य मानवी हक्क आयोगातील सदस्यांचा पदावधी**

१) अध्यक्षपदी नियुक्त झालेली व्यक्ती सदर पदावर नेमणूकीच्या दिनांकापासून ५ वर्षाकरिता अथवा सदर व्यक्ती वयाच्या ७० वर्षापर्यन्त जे आधी होईल त्याप्रमाणे राहील.

२) सदस्य पदी नियुक्त झालेली व्यक्ती सदर पदावर नेमणूकीच्या दिनांकापासून ५ वर्षाकरिता राहील व ५ वर्षानंतर सदर व्यक्ती पुनर्नियुक्तीस पात्र असेल.

परंतु कोणताही सदस्य वयाच्या ७० वर्षानंतर सदस्य या पदावर राहणार नाही.

३) अध्यक्ष किंवा सदस्य यांनी कार्यभार सोडल्यानंतर त्यांना राज्य शासन अथवा केंद्र शासन सेवेसाठी अपात्र ठरविले जाईल.

७. **विशिष्ट परिस्थितीमध्ये सदस्यांनी अध्यक्ष पदाचा कार्यभार सांभाळून कार्य करणेबाबत.**

१) अध्यक्षाचा मृत्यु किंवा राजीनाम्यामुळे किंवा अन्य कोणत्याही कारणामुळे अध्यक्षाचे पद रिक्त झाल्यास, राज्यपाल अधिसूचनेद्वारे कोणत्याही एका सदस्यास नवीन अध्यक्षांची नेमणूक होईपर्यन्त त्यास अध्यक्ष पदाचा कार्यभार सांभाळण्यास प्राधिकृत करु शकतील.

२) जेव्हा अध्यक्ष रजेवर असल्यामुळे किंवा अन्य कोणत्याही कारणांमुळे कार्य करण्यास असमर्थ ठरतील तेव्हा राज्यपाल एखाद्या सदस्याला अधिसूचनेद्वारे अध्यक्षाचा कार्यभार ते सेवेत पुन्हा रुजू होण्याच्या दिनांकापर्यन्त अध्यक्षाची जबाबदारी पार पाडण्यास प्राधिकृत करतील.

८. **राज्य मानवी हक्क आयोगाच्या सदस्यांच्या सेवेच्या अटी व शर्ती**

राज्य शासनाने ठरवून दिलेल्या सेवाशर्तीनुसार सदस्यांना वेतनभत्ते व सेवेच्या इतर अटी व शर्ती अनुज्ञेय राहतील. परंतु कोणत्याही सदस्याच्या नेमणूकीनंतर त्याचे अहित होईल अशा प्रकारे त्यांच्या वेतन व भत्ते किंवा सेवेच्या इतर अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाही.

९. **राज्य मानवी हक्क आयोगाच्या सदस्यांना काढून टाकणेबाबत.**

राज्य मानवी हक्क आयोगाच्या अध्यक्ष अथवा सदस्याला मानवी हक्क संरक्षण अधिनियम, १९९३ च्या कलम २३ मधील तरतुदीनुसार कार्यमुक्त करता येईल.

१०. **राज्य मानवी हक्क आयोगासाठी कर्मचारीवृंदाची पदनिर्मिती.**

शासन आयोगाच्या आस्थापनेवर खालीलप्रमाणे पदनिर्मितीस मंजूरी देत आहे :-

| | |
|---|---|
| १) अधीक्षक | - १ |
| २) सहाय्यक | - १ |
| ३) उच्चश्रेणी लघुलेखक | - २* |
| ४) निम्नश्रेणी लघुलेखक | - १* |
| ५) लिपिक | - २ |
| ६) शिपाई | - २ |
| ७) वाहन चालक | - २ |

(*) यापैकी एक मराठी लघुलेखक असावा.

विशेष कार्य अधिकारी, राज्य मानवी हक्क आयोग या पदाचा अतिरिक्त कार्यभार प्रधान सचिव (अपील व सुरक्षा), गृह विभाग यांच्याकडे सुपुर्द करण्यात यावा.

राज्य मानवी हक्क आयोगाचे कामकाज उत्कृष्टपणे पार पाडण्यासाठी राज्य

शासन आवश्यक ते पोलीस व तपासी कर्मचारी तसेच पोलीस महानिरीक्षक दर्जापेक्षा कमी नसलेले अधिकारी यांच्या अधिपत्याखाली आवश्यक ते अधिकारी व कर्मचारी मंजूर करेल.

११. **मानवी हक्क न्यायालये**

मानवी हक्कांच्या पायमल्ली संदर्भात झालेल्या गुन्हयांच्या न्याय-चौकशी प्रकरणांवर शिघ्रगतीने न्याय-चौकशी होण्यासाठी राज्य शासन उच्च न्यायालयाच्या मुख्य न्यायाधीशांच्या सहमतीने अधिसूचनेद्वारे प्रत्येक जिल्हयासाठी एका सत्र न्यायालयास सदरच्या गुन्हयाची न्याय-चौकशी करण्यासाठी मानवी हक्क न्यायालय म्हणून विनिर्दिष्ट करील.

१२. **राज्य मानवी हक्क आयोगाचे विशेष वार्षिक अहवाल**

१) राज्य मानवी हक्क आयोग हा राज्य शासनाला वार्षिक अहवाल सादर करील आणि इतर कोणत्याही महत्वाच्या व तातडीच्या बाबींवर अंतिम वार्षिक अहवाल सादर करेपर्यन्त थांबणे शक्य नाही अशा प्रकरणी विशेष अहवाल कोणत्याहीक्षणी सादर करील.

२) राज्य मानवी हक्क आयोगाने सादर केलेल्या वार्षिक व विशेष अहवाल व अहवालामधील शिफारशींवर करण्यात आलेली कार्यवाही व करावयाच्या कार्यवाहीची माहिती तसेच आयोगाच्या शिफारशी स्वीकारावयाच्या नसल्यास, त्याबाबतच्या कारणमिमांसेसह ज्ञापन विधान मंडळाच्या प्रत्येक सभागृहाच्या पटलावर राज्य शासन ठेवील.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ७५/२०००/व्यय-४, दिनांक १३ जानेवारी २००० अन्वये वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कु. के. एस. सय्यद )
सह सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्य न्यायाधीश, उच्च न्यायालय,मुंबई यांचे सचिव,
३) मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) उप मुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
५) राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
६) सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
७) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई,
८) सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
९) सर्व पोलीस आयुक्त / अधीक्षक,

१०) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य,मुंबई /नागपूर,
११) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
१३) सर्व विभागीय आयुक्त,
१४) सर्व जिल्हाधिकारी,
१५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१६) सर्व मंत्रालयीन विभाग,
१७) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त कार्यालय.मुंबई.
१८) सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय, विधान भवन,मुंबई.
१९) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
२०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई,
२१) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक,
२२) प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग यांचे स्वीय सहाय्यक,
२३) प्रधान सचिव, गृह विभाग (विशेष) यांचे स्वीय सहाय्यक,
२४) निवड नस्ती.

# परिशिष्ट -१

## राज्य मानवी हक्क आयोगाची कार्ये

(१) भारतीय घटना आणि समाजातील सर्व घटकांच्या मानवी हक्कांचे सरक्षण वृध्दिंगतासाठी असलेले कायदे तसेच संरक्षक उपाययोजना या सर्व बाबी अभ्यासणे , तपासणे आणि पुर्नविलोकन करुन परिणामकारक अंमलबजावणी करण्याच्यादृष्टीने शिफारशी करणे.

(२) मानवी हक्क जोपासणे आणि वृध्दिंगत करणे याबाबत अस्तित्वात असलेल्या घटनात्मक व वैधानिक तरतूदींचा अभ्यास करणे, पुनर्विलोकन करणे आणि त्यासंबंधात उणिवा, अपुरेपणा, वैगुण्ये असल्यास विधिविधानात तसा बदल सुचवून त्यावर मात करणे.

(३) समाजातील सर्व घटकांच्या मानवी हक्कांचे संरक्षण व संवर्धन करण्यासाठी, कायद्याच्या चौकटीला, साचाला अधिक बळकटी आणणे आयोगाला आवश्यक वाटेल तेव्हा नवीन कायद्याची विधिनियमितीची शिफारस करणे.

(४) मानवी हक्क संरक्षणाबाबत करण्यात आलेले कायदे व मानवी हक्कांच्या पायमल्लीला अटकाव करण्यासाठी करण्यात आलेले कायदे तसेच नागरिकांच्या मानवी हक्कांसंबधी घेण्यात आलेले धोरणात्मक निर्णय, मार्गदर्शक सूचनांची अमंलबजावणी होत नसल्याबाबत किंवा मानवी हक्कांपासून वंचित केल्याबद्दल तक्रार प्राप्त झाल्यास किंवा स्वत:हून यासर्व प्रकरणांची दखल घेणे.

(५) नागरी आणि राजकीय हक्कांच्या पायमल्लीच्या तक्रारी, पायमल्लीस प्रोत्साहन देण्याबाबत किंवा नागरी आणि राजकीय हक्कांबाबतची कर्तव्ये पार पाडताना दुर्लक्ष करणे, या सर्व बाबतीत स्वत:हून किंवा वंचित व्यक्ती किंवा त्या व्यक्तीच्या वतीने प्राप्त झालेल्या तक्रारींची चौकशी करणे.

(६) आयोगाच्या मतानुसार अतिसंवेदनक्षम व मानवी हक्कांच्या पायमल्लीस प्रवण असलेले विशिष्ट ठिकाण व परिस्थितीचे विशेष अध्ययन करणे व तपास हाती घेणे व त्याबाबतचा अहवाल तयार करणे व संबंधित प्राधिकरणाकडे शिफारशी पाठविणे.

(७) मानवी हक्कासाठी आदर वाढविणे तसेच समाजातील सर्व घटकांना व प्रशासकीय यंत्रणेतील सर्व स्तरांवर सन्मान वाढविणे यासाठी मानवी हक्कांच्या साक्षारतेचा प्रसार करणे व त्याअनुषंगिक देशातील मानवी हक्काबाबतच्या स्थितीची जाणीव करुन देण्याकरिता प्रोत्साहनात्मक व शैक्षणिक कार्यक्रम आयोजित करणे.

(८) प्रशासकीय वर्ग आणि जनता यांच्यासाठी प्रशिक्षण व दिशादर्शक कार्यक्रम आयोजित करणे.

(९) मानवी हक्कांचे उल्लंघनास प्रतिबंध करण्यासंदर्भात फौजदारी प्रशासन प्रणाली व कारागृह सुधारणा , इत्यादीबाबत अभ्यास करुन शिफारशी करणे.

(१०) आंतरराष्ट्रीय करार, प्रसविदा आणि मानवी हक्कांशी संबंधित साधने यांचा अभ्यास करुन समाजातील सर्व घटकामध्ये आणि आणि प्रशासनात आवश्यक तो समंजसपणा वाढेल अशा शिफारशी करणे.

(११) आंतरराष्ट्रीय संबंधित साधने किंवा घोषणा किंवा प्रसंविदांच्या तरतूदीचे पालन करण्याकरिता देशातील मानवी हक्कांच्या परिस्थितीची जाणीव करुन देऊन सामंजस्य वाढविण्यासाठी शासनाला सल्ला देणे व उपाययोजना सुचविणे.

(१२) आंतरराष्ट्रीय तसेच राष्ट्रीय मानवी हक्क संघटनांशी संपर्क साधण्यासाठी माध्यमे स्थापन करणे.

(१३) मानवी हक्कांशी संबंधित संशोधन कार्यक्रम हाती घेणे किंवा प्रायोजित करणे.

(१४) मानवी हक्काच्या अविभाज्य स्वरुपात जोपासना व संरक्षण करण्यासाठी कायद्यानुसार आवश्यक असलेली कर्तव्ये पार पाडणे व इतर कार्यवाही करणे.

# परिशिष्ट -२

## राज्य मानवी हक्क आयोगाचे अधिकार

(१) केंद्र सरकार आणि राज्य सरकार यांच्याकडून माहिती आणि अहवाल मागणे आणि आयोगाने मागविलेली माहिती विलंब न लावता उपलब्ध करुन दिली जाईल, याची प्राधिकरणाने तसेच संघटनांनी खात्री केली पाहिजे.

२) केंद्र किंवा राज्य सरकारच्या कोणत्याही प्राधिकरणाकडून कथित मानवी हक्कांच्या उल्लंघना प्रकरणीपायमल्ली प्रकरणी प्राप्त झालेल्या तक्रारीवर संबंधित प्राधिकरणाकडून अहवाल / माहिती मागविल आणि संबंधित प्राधिकरणाने विलंब न लावता माहिती पुरविली पाहिजे.

(३) मानवी हक्कांच्या पायमल्लीची प्रकरणे किंवा विशिष्ट उद्देशासाठी एखादा विशिष्ट असा प्रश्न किंवा मानवी हक्क क्षेत्रातील प्रश्न कायद्याच्या चौकटीत बसवून हाताळण्यासाठी, आयोग त्यांच्या सदस्यांचे उप आयोग किंवा आयोगाच्या अधिका-यांची उपसमितीचो नियुक्ती करेल.

असे उपआयोग किंवा उपसमित्यांना त्यांची कर्तव्ये पार पाडीत असतांना त्यांना आयोगाचे अधिकार असतील. त्यांनी त्यांचे अहवाल किंवा निष्कर्ष आयोगाला सादर केले पाहिजेत, त्यांचे अहवाल निष्कर्ष हे आयोगाचे अहवाल निष्कर्ष असतील असे मानण्यात येऊ नये.

(४) आयोगाला योग्य वाटल्यास आयोगाचे सदस्य नसलेल्या आवश्यक त्या संख्येत व्यक्तींना सदस्य म्हणून स्विकृत करण्याचे अधिकार प्राप्त राहतील व अशाप्रकारे समितीवर नियुक्त केलेल्या व्यक्तींना आयोगाने विहित केल्यानुसार भत्ता किंवा बैठक भत्ता अनुज्ञेय राहील.

(५) मानवी हक्काच्या उल्लंघनाबाबतच्या तक्रारीचो व पुराव्याशिवाय करण्यात आलेल्या आरोपांची चौकशी करण्याकरिता आयोगाला विशेषत: खाली उल्लेख केलेल्या बाबींवर दिवाणी न्यायालयाप्रमाणे सुनावणी देण्याचे अधिकार प्राप्त राहतील.

(अ) भारताच्या कोणत्याही भागातून कोणत्याहो व्यक्तिला समन्स काढणे व त्यांना उपस्थित रहाण्यास भाग पाडणे आणि त्यांची शपथेवर तपासणी करणे

(ब) कोणतेहो दस्तऐवज शोधून काढणे व सादर करणे.

(क) शपथपत्र प्रारुपाचा पुरावा स्विकारणे.

(ड) कोणतेही न्यायालयाकडून किंवा कार्यालयातून कोणत्याही शासकीय अभिलेखाची किंवा त्यांच्या प्रतींची मागणी करणे.

(इ) साक्षीदारांची किंवा दस्तऐवजांची तपासणी करण्याबाबतच्या कृतीचे आदेश काढणे.

(ई) नियमाने विहित करण्यात आलेली इतर कोणतीही बाब.

(६) आयोगाला, त्यांच्या कामकाजासंबंधात शासनाच्या सहमतीने नियम तयार करण्याचे अधिकार द्यावेत.

(७) या अधिनियमात नमूद केलेल्या तरतूदींच्या अधिन राहून खालीलप्रमाणे स्वत:ची कार्यपध्दती विकसित करण्याचा तसेच स्विकृत करण्याबाबतचे अधिकार आयोगास प्रदान करण्यात यावेत.

(अ) मानवी हक्कांचे उल्लंघन केल्याबाबतच्या प्रकरणी प्राप्त झालेल्या तक्रारीवर आयोग संबंधित प्राधिकरणाकडून विहित मुदतीत अहवाल मागविल.

(ब) अहवाल प्राप्त न झाल्यास व आयोगाला सदर प्रकरणात चौकशी करणे आवश्यक आहे, असे समाधान झाल्यास सदर प्रकरणाची चौकशी आयोगास करता येईल.

(क) अहवाल प्राप्त झाल्यावर संबंधित प्राधिकरणापुढे योग्य ती कार्यवाही झालेली आहे असे आयोगास आढळल्यास आयोग तक्रारीत लक्ष न घालता तक्रारदारास संबंधित प्राधिकरणाशी संपर्क साधण्यास कळविल.

(ड) आयोग तक्रारीचे स्वरुप पाहून सदर तक्रार त्यांच्या अधिकार कक्षेत येत नसेल किंवा तक्रारदारास पर्यायी उपाय उपलब्ध असेल तर तक्रारदाराला आयोग सक्षम प्राधिकरणाशी संपर्क साधण्यास कळवेल.

(इ) कोणत्याही प्रकरणी आयोगाला चौकशी आवश्यक असल्याचे समाधान झाल्यास सदर प्रकरणी आयोग चौकशी सुरु करेल.

(ई) चौकशी पूर्ण झाल्यावर तक्रारीत तथ्य असल्याचे सिध्द झाल्यास आयोग आपल्या निष्कर्षावर आधारित जबाबदार असलेल्या व्यक्तीविरुध्द करावयाच्या कारवाईची शिफारस सबंधित प्राधिकरणाकडे केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयास पृष्ठांकित करुन त्याची एक प्रत तक्रारदारास किंवा त्याच्या प्रतिनिधीस उपलब्ध करुन देईल.

(फ) जर सदर तक्रार खोटी असल्याचे सिध्द झाल्यास आयोग ती फेटाळेल व खोटी व उपद्रवकारक तक्रार दाखल करुन आयोगाची दिशाभूल जाणीवपूर्वक केल्याबाबत संबंधित व्यक्तीविरुध्द कारवाईची शिफारस करेल.

(८) आयोगाला योग्य वाटेल त्याप्रमाणे आयोग कोणत्याही प्रकरणाची चौकशी व तपासणी करील व पुराव्याच्या नियमास बांधील राहणार नाही.

(९) मानवी हक्कांशी संबंधित असलेल्या कोणत्याही खटल्यास आयोग न्यायालयाने त्या प्रकरणात ठरवून दिलेल्या अटींच्या अधीन राहून संबंधित खटल्याच्या कामकाजात हस्तक्षेप करु शकेल.

(१०) आयोगाला कारागृहे आणि इतर स्थानबध्दित केन्द्रे यांना भेट देण्याचे अधिकार दिलेले असतील.

(११) आयोगाला आवश्यक असलेल्या कोणत्याही स्वरुपात साक्ष किंवा पुरावे देणा-या व्यक्तीस त्यांच्याविरुध्द भरण्यात येणा-या खटल्यातून मुक्त करण्याचे अधिकार राहतील

(१२) आयोगास केन्द्र व राज्य शासनाच्या अखत्यारीतील कोणताही विभाग, संस्था, कार्यालय अथवा स्वायत्त संस्था यांच्याकडून आयोगाची कार्यप्रणाली पुढे चालू ठेवण्यासाठी मदत घेण्याचे अधिकार प्राप्त राहतील.

(१३) आयोग खालील प्रकरणांच्या तक्रारीमध्ये हस्तक्षेप करणार नाही.

(अ) तक्रार दाखल केल्यापासून बारा महिन्यापूर्वी घडलेल्या घटनांबाबत

(ब) जर कथित तक्रार ही तपासाधीन असेल किंवा न्यायप्रविष्ट असेल परंतु तपासाला खूप विलंब केल्याबाबतची तक्रार प्राप्त झाल्यास आयोग संबंधित विभागाकडून अहवाल मागवून त्यावर आवश्यक ती कार्यवाही करेल.

(क) ज्या प्रकरणी राष्ट्रीय सुरक्षिततेच्या किंवा सार्वजनिक हिताच्या किंवा कायद्यात नमूद केलेल्या कोणत्याही कारणामुळे एखादी माहिती किंवा दस्तऐवज आयोगास देणे हितकारक नाही असे संबंधित सक्षम प्राधिका-याने प्रमाणित केल्यास.

(ड) राष्ट्रीय मागासवर्गीय जाती / जमाती आयोग, महिला आयोग आणि अल्पसंख्यांक आयोग या तीन राष्ट्रीय आयोगापैकी कोणत्याही एका आयोगाच्या कार्यकक्षेत असलेली प्रकरणे किंवा इतर कोणत्याही आयोगाकडे तपासणी होत असलेले प्रकरण

(इ) केंन्द्र सरकारच्या सशस्त्र दलाविरुध्दची एखादी तक्रार, आयोग संबंधित सक्षम प्राधिकरणाकडे पाठवून त्यावर करण्यात आलेल्या कार्यवाहीबाबतचा अहवाल प्राप्त करुन घेईल.

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**
Home Department,
No.HRC-1099/378/Pol-14
Mantralaya, Mumbai 400 032, Dated the 15th January 2000.

**Read:** 1) Protection of the Human Rights Act, 1993.
2) Letters No.40/1/CH/NHRC-94 dtd. the 4th October,1994 and 18th July, 1995 received from the Justice Ranganath Mishra, Chairperson, N.H.R.C.
3) Letter No.5011/70/96-HR dtd. the 7th Sept.1996 received from Ex-Home Minister, Govt. of India, New Delhi.
4) Letter dated 18th January, 1999 from Home Minister, Government of India, New Delhi.

**PREAMBLE:**

The issue of promotion and protection of the Human Rights of people in a civilised society is a matter of prime concern for any progressive democratic Government. Inspite of various constitutional and legal safeguards and institutional mechanism for upholding the fundamental rights of the people yet a number of complaints are received about deprivation and infringement of human rights, perhaps due to various socio-economic factors, new stresses and pressures that are threatening peace and stability of our society at large.

**RESOLUTION** :

In view of the above factors and considering the recommendations made by the NHRC and the Government of India, the Government of Maharashtra has now decided to set up a State Human Rights Commission in the State in accordance with the provisions contained in Chapter V,Sec.21 of the Protection of Human Rights Act, 1993.

2. The State Human Rights Commission shall consist of:

(a) a Chairperson who has been a Chief Justice of High Court

(b) one Member who is, or has been, a Judge of a High Court

(c) One Member who is, or has been, a district Judge in that State;

(d) two Members to be appointed from amongst persons having knowledge of, or practical experience in, matters relating to human rights.

3. The headquarters of the State Commission shall be at Mumbai.

4. **Powers and Functions of the Commission**

The State Human Rights Commission may inquire into violation of human rights in respect of matters related to any of the entries enumerated in List II and List III in the Seventh Schedule to the Constitution (as per Annexure-I).

Provided that if any such matters is already being inquired into by the Commission or any other Commission duly constituted under any law for the time being in force, the State Commission shall not inquire into the said matter.

The powers of the Commission will be as per details given in Annexure-II.

5. **Appointment of Chairperson and other Members of State Commission.**

The Chairperson and other members of the Commission shall be appointed by Governor in accordance with the provisions contained inSec.22 of the said Act. Accordingly Government approves the constitution of the following Committee for making recommendations for the a term of five years from the date on which he enters upon his office or until he attains the age of seventy years, whichever is earlier. appointment of the Chairperson and members of the Commission:

| | | |
|---|---|---|
| (a) | Chief Minister | Chairperson |
| (b) | Speaker of the Legislative Assembly | Member |
| (c) | Deputy Chief Minister | Member |
| (d) | Leader of the Opposition in the Legislative Assembly. | Member |
| (e) | Leader of the Opposition in the Legislative Council. | Member |

Provided also that no sitting Judge of a High Court or a sitting district judge shall be appointed except after consultation with the Chief Justice of the High Court.

No appointment of a Chairperson or a Member of the State Commission shall be invalid merely by reason of any vacancy in the Committee.

6 **Term of office of Members of the State Commission.**

1) A person appointed as Chairperson shall hold office for a term of five years from the date on which he enters upon hisofice or until he attains the age of seventy years, whichever is earlier.

2) A person appointed as a Member shall hold office for a term of five years from the date on which he enters upon his office and shall be eligible for re-appointment for another term of five years.

Provided that no Member shall hold office after he has attained the age of seventy years.

3) On ceasing to hold office, a Chairperson or a Member shall be ineligible for further employment under the Government of a State or under the Government of India.

**7. Member to act as Chairperson or to discharge his functions in certain circumstances.**

1) In event of the occurrence of any vacancy in the office of the Chairperson by reason of his death, resignation or otherwise, the Governor may, by notification, authorise one of the Members to act as the Chairperson until the appointment of a new Chairperson to fill such vacancy.

2) When the Chairperson is unable to discharge his functions owing to absence on leave or otherwise, such one of the Members as the Governor may, by notification, authorise in this behalf, shall discharge the functions of the Chairperson until the date on which the Chairperson resumes his duties.

**8. Terms and conditions of service of Members of the State Human Rights Commission.**

The salaries and allowances payable to, and other terms and conditions of service of, the Members shall be such as may be prescribed by the State Government.

Provided that neither the salary and allowances nor the other terms and conditions of service of a Member shall be varied to his disadvantage after his appointment.

**9. Removal of a Member of the State Human Rights Commission.**

The removal of the Chairperson or any other members of the State Human Rights Commission shall be as per provisions contains in Section 23 of the Protection of the Human Rights Act, 1993.

10. **<u>Creation of staff for the State Human Rights Commission</u>.**

Government is pleased to sanction the creation of the following posts on the establishment of the Commission.

1) Superintendent 1

| | | |
|---|---|---|
| 2) | Assistant | 1 |
| 3) | Higher Grade Stenographer | 2* |
| 4) | Lower Grade Stenographer | 1* |
| 5) | Clerk | 2 |
| 6 | P eon | 2 |
| 7) | Driver | 2 |

(*) out of these posts one post shall be that of Marathi Stenographer.

Additional charge of the post of Officer on Special Duty, State Human Rights Commission shall be given to Principal Secretary (Appeal & Security), Home Department.

The State Government shall also make available such police and investigative staff under an officer not below the rank of an Inspector General of Police and such other officers and staff as may be necessary for the efficient performance of the functions of the State Human Rights Commission.

**10. Human Rights Courts**

For the purpose of providing speedy trial of offences arising out of violation of human rights, the State Government may, with the concurrence of the Chief Justice of the High Court, by notification, specify for each district a Court of Session to be Human Rights Court to try the said offences.

**11. Annual and special reports of the State Human Rights Commission.**

1) The State Human Rights Commission shall submit an annual report to the State Government and may at any time submit special reports on any matter which, in its opinion, is of such urgency or importance that it should not be deferred till submission of the annual report.

2) The State Government shall cause the annual and special reports of the State Commission to be laid before each House of State Legislature with a memorandum of action taken or proposed to be taken on the recommendations of the State Human Rights Commission and the reasons for non-acceptance of the recommendations, if any.

These orders issue with the concurrence of Finance Department Vide No. 75/2000/Exp.4, Dated the 13 th January 2000.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

( K.S. Syed )
Joint Secretary,Govt. of Maharashtra.
Home Department.

To,

1) Secretary to the Governor,
2) Secretary to the Chief Justice, High Court,Mumbai,
3) Private Secretary to Chief Minister,
4) Private Secretary to Deputy Chief Minister,
5) Private Secretary to the Ministers of State (Home),
6) Private Secretary to All Ministers / State Ministers,
7) Director General & Inspector Generals of Police, Maharashtra State,Mumbai,
8) All Special Inspector Generals of Police,
9) All Police Commissioners / Superitendent Of Police,
10) Accountant General, Maharashtra State, Mumbai / Nagpur,
11) Pay & Account Officer, Mumbai,
12) Residential Audit Officer, Mumbai,
13) All Divisional Commissioners,
14) All Collectors,
15) All Chief Executive Officer, Zilla Parishad,
16) All Secretary, Mantralaya Department,
17) Registar, Office of the Lok Ayukta & Uplokayukta, Mumbai,
18) Secretary, Maharashtra Legislative Secretariate,Vidhan Bhavan, Mumbai,
19) Secretary, Maharashtra Public Service Commission, Mumbai,
20) Director General, Directorate of Information and Publicity,Mumbai,
21) P.A. to Addl.Chief Secretary,( Home ),
22) P.A. to Principal Secretary (Appeal & Security),Home Deptt
23) P.A. to Principal Secretary (Special), Home Deptt., Mumbai,
24) Select File.

## ANNEXURE - I

## FUNCTIONS OF THE STATE HUMAN RIGHTS COMMISSION

i) to study, investigate and review all matters relating to the safeguards provided under the Constitution and the Laws for protection and promotion of Human Rights of all sections of the society, and make recommendations on the steps necessary for effective implementation of the safeguards provided for this purpose;

ii) to study and review existing Constitutional and Legislative provisions relating to the preservation and promotion of Human Rights, and recommend amendments thereto so as to overcome any lacunae, inadequacies or shortcomings in such legislation;

iii) to recommend enactment of new laws, as may be considered necessary by the Commission, to further strengthen the legal framework for protection and preservation of human rights of all sections of society;

iv) to look, suo-motu or on complaint, into matters relating to deprivation of human rights; non-implementation of Laws enacted to provide protection and prevention of violation of Human Rights; and non-compliance of policy decisions, guidelines, or instructions issued to ensure the protection of human rights of the citizens;

v) to inquire, suo-motu or on complaint by the victim, or any one else on his behalf, into specific complaints of violations of the civil and political rights, abetment thereof, or negligence in performance of duties connected therewith;

vi) to undertake special studies and investigations into specific areas and situations which in the opinion of the Commission, are specially sensitive and/or prone to violations of human rights, and make report and recommendations to the appropriate authorities;

vii) to conduct promotional and educational activities with a view to disseminating human rights literacy and promoting a contextual understanding of the human rights situation in the country and enhance respect for human rights and dignity among all sections of the society and at all levels of the administrative system;

viii) to devise training and orientation programmes for members of the administration and the public;

ix) to study and make recommendations in respect of the system of criminal administration and prison reforms etc., which may be relevant in the context of prevention of violation of human rights;

x) to study international covenants and instruments relating to human rights and recommend any measures that may be considered necessary to promote greater understanding of them among all sections of the society and administration;

xi) to advise the Government on measures to promote understanding of the human rights situation in the country and suggest action, if any, that needs to be taken in order to comply with the provisions of the convenants or declarations or relevant international instruments;

xii) to establish channels of communication with National and International Human Rights organisations;

xiii) to undertake or sponsor research programmes on human rights matters; and

xiv) to perform such other duties as may be provided by the law and to perform on its own or on the request of the Government such other functions as may be necessary for the promotion and preservation of human rights in their larger indivisible form.

*********************

## ANNEXURE - II

## POWERS OF THE STATE HUMAN RIGHTS COMMISSION

i) To ask for information and reports from the Central and State Governments, and their authorities and organisations who shall ensure that the required information is made available without any delay.

ii) On receipt of any complaint of alleged violation of human rights by any functionary of the State and Central Governments, the Commission may call for a report from the concerned authority, and the concerned authority shall furnish the same without any delay.

iii) The Commission may appoint Sub-Commissions of its members, or Sub-Committees of its officers, to enquire into cases of human rights violations or for purposes of study of any specific problems or situations in the Human Rights field.

Such Sub-Commissions or Sub-Committees in the discharge of their responsibilities shall have all the powers of the Commission. They shall, however, report their findings to the Commission, and their reports or findings shall not be deemed to be the reports or findings of the Commission.

iv) The Commission shall have the power to co-opt as members of any Committee set up by it, such number of persons who are not Members of the Commission, as it may think fit. Any person co-opted on any Committee shall be entitled to receive such allowances or sitting fees as may be prescribed by the Commission.

v) For purposes of conducting enquiries into complaints and allegations of human rights violations, the Commission may be given the powers of a Civil Court trying a suit and, in particular in respect of the following matters:-

a) summoning and enforcing attendance of any person from any part of India and examining him on oath;

b) requiring the search and production of any document;

c) receiving evidence in the form of affidavits;

d) requisitioning any public record or copy thereof from any court or office;

e) issuing commissions for the examination or witnesses and documents;

f) any other matter which may be prescribed by Rules.

With respect to (a) above it may be useful to stipulate that the Commission will ordinarily take evidence in the form of affidavits, because it may pose serious difficulties and cause considerable inconvenience to have persons from all over the country coming to Delhi to depose before the Commission.

vi) The Commission may be given the power to formulate rules of its business, with the concurrence of the Government.

vii) The Commission could be given the power to evolve and adopt its own procedures subject to the broad principles to be enumerated in the Act and these could be as follows:

a) On receipt of a complaint of an alleged violation of human rights, the Commission shall call for a report from the concerned authority within a stipulated period;

b) if no report is received, the Commission may proceed to enquire into the complaint, if it is otherwise satisfied that such enquiry is called for;

c) if on receipt of the report, the Commission is satisfied that action has been initiated before a competent authority, it may drop the complaint and advise the complainant to approach the concerned authority;

d) if even otherwise, by the nature of the complaint, the Commission is satisfied that it does not fall within its purview, or an alternative remedy is available, it may ask the complainant to approach the competent authority;

e) if the Commission is satisfied that an enquiry is called for, it may proceed further to enquire into the same;

f) upon completion of the enquiry if the complaint is found to be established, the Commission will prepare its report containing its findings and recommendations about the action to be taken against those found responsible, and transmit it to the concerned authority, under intimation to the Ministry of Home Affairs in the Central Government, with a copy to the complainant or his representative;

g) if the complaint is found to be false, the Commission may, apart from dismissing it, recommend action against anyone found to have deliberately misled the Commission or filed a false and mischievous report;

viii) the Commission may make an examination or hold enquiry in such manner as it deems fit, and, it will not be bound by rules of evidence;

ix) where the Commission considers appropriate to intervene in any proceedings in a court that involve human rights issues, it may do so subject

to such conditions as may be imposed by the Court conducting the proceedings;

x) the Commission may be given visitorial powers over jails, prisons and other detention centres;

xi) the Commission may have powers to grant immunity from prosecution to any person whose testimony or evidence in any other form is considered by it to be necessary.

xii) the Commission may be empowered to seek assistance of any department, bureau, office or agency of the Central Government and/or the State Government including their autonomous bodies, in the performance of its functions.

xiii) the Commission shall not entertain any complaints in the following cases :-

a) incidents that may have occurred before a period of twelve months from the date of complaint;

b) if the allegation is already under investigation, or sub-judice provided that if the complaint is about undue delay in investigation the Commission may call for a report from the concerned authorities, and take further appropriate action;

c) where a competent authority certifies that it is not in the interest of national security or public order or on any other ground specified in the Act to provide any information or documents to the Commission;

d) any matter which is in the purview of any of the three national Commissions viz., for SC/ST, Women or Minorities or which is under investigation of any other Commission;

e) in any complaint against Armed Forces of the Union, the Commission may forward the complaint to the concerned authority and call for a report of action taken thereon.

************